**कालवा स्वच्छता कामे, संयुक्त**
**<u>तपासणी करणे.</u>**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक.पाखरण-११.०९/प्र.क. १४०/०९/ यांत्रिकी
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२
दिनांक- १७/३/२०१०

**<u>परिपत्रक</u>**

महाराष्ट्रातील विविध स्थापत्य प्रादेशिक विभागाकडील मोठया मध्यम व लघु प्रकल्पावरील कालव्याची दुरुस्ती, स्वच्छता गाळ निर्मुलन व झाडेझुडपे काढण्याची कामे यांत्रिकी संघटनेकडील उपलब्ध यंत्रसामुग्रीद्वारे करण्यात येतात. सदर कामे करताना यांत्रिकी संघटनेने प्रत्यक्ष केलेली कामे व स्थापत्य विभागामार्फत अंदाजपत्रकात दर्शविलेली कामे यामध्ये तफावत असल्याचे वेळोवेळी शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. कालवा स्वच्छता कामाच्या बाबतीत सुसूत्रता रहावी याकरीता खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत.

पाखरण कार्यक्रमांतर्गतची कालवा स्वच्छतेची गाळ निर्मूलनाची व झाडेझुडपे काढण्याची जी कामे यांत्रिकी संघटनेमार्फत करुन घ्यावयाची आहेत, अशी कामे सुरु करण्यापुर्वी स्थापत्य विभागाने मोजमापे घेऊन या कामासाठी आवश्यक असणारे पूरक रस्ते व इतर अनुषंगिक कामांचा अंतर्भाव अंदाजपत्रकांमध्ये स्वतंत्रपणे करण्यात यावा व सविस्तर अंदाजपत्रके तयार करावीत व त्यास सक्षम अधिका-याची तांत्रिक मंजूरी घेवून तद्नंतर सदर अंदाजपत्रके यांत्रिकी संघटनेकडील सबंधित यांत्रिकी विभागास पुढील कार्यवाहीसाठी द्यावीत.

यांत्रिकी संघटनेमार्फत करण्यात येणारी मातीकामे व कालवा स्वच्छता कामे पूर्ण झाल्यानंतर स्थापत्य व यांत्रिकी विभागांनी संयुक्त तपासणी करुन कामांची मोजमापे अंतिम करावीत. सदर संयुक्त मोजमापे कार्यवाहीचे नियंत्रणाची जबाबदारी संबंधीत स्थापत्य व यांत्रिकी विभागाचे कार्यकारी अभियंता यांची राहील. संयुक्तपणे घेतलेल्या मोजमापानुसार प्रत्यक्ष केलेल्या कामाचे परिमाण व झालेल्या एकूण खर्चाची तुलना मूळ अंदाजपत्रकाशी करुन तफावतीची कारणमिमांसा शोधून सुधारीत अंदाजपत्रकास सक्षम स्तरावर मंजूरी घ्यावी.

वरील परिच्छेदात नमूद केलेल्या पध्दतीनुसार एखादे प्रायोगिक क्षेत्र निवडून त्या ठिकाणी येणाऱ्या निष्कर्षाबाबतचा अहवाल मु.अ.(यां) नाशिक व स्थापत्य मु.अ. यांनी तपासून अशी पध्दत जलसपंदा

विभागात कायम करणेकरीता मु.अ.(यां) नाशिक यांनी संयुक्त मोजणी पध्दतीचा प्रस्ताव शासनास मंजूरीकरीता दिनांक ३१ मार्च,२०१० पूर्वी सादर करावा.

कालवा स्वच्छता गाळ निर्मूलन व झाडेझुडपे काढणे हया संवर्गात जी कामे यांत्रिकी संघटनेमार्फत केली जात आहेत त्यांचा तपशील शासन स्तरावरील मुख्य अभियंता समवेत होणा-या द्वैमासिक बैठकीत मु.अ.(यां) व सर्व मुख्य अभियंता (स्थापत्य) यांनी सादर करावा. दरवर्षीचा प्रकल्पाचे मातीकाम व कालवा स्वच्छता हया कामामधला गुणांक शासनस्तरावर निश्चित करणेत येईल.

सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००३१७१५१७२८००१ असा आहे.

(प्र.म.अबनावे)

शासनाचे उप सचिव

प्रति,

जलसंपदा विभागातील सर्व क्षेत्रिय मुख्य अभियंता,

यांत्रिकी कार्यासन संग्रहार्थ